चंद्रपूर जिल्हा परिषदेतील बांधकाम विभागातील रोजंदारी/ कार्यव्ययी आस्थापनेवरील श्री. मुऱ्हारी जयराम शेंडे व इतर एकूण १२ कर्मचाऱ्यास न्या.कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः काव्यआ-२०१४/प्र.क्र.७७/आस्था.१०,
बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २ मार्च,२०१५.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल,२००१.
२) शासन निर्णय क्रमांकः विभागीय आयुक्त,नागपूर यांचे पत्र क्र.विशा/कार्या-११(४)/कावि-१२२६/२०१३, १/८/२०१३.

## शासन निर्णय

रोजंदारी/कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५,दि.२४ एप्रिल,२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, नागपूर यांचे प्रस्तावातील श्री.मुऱ्हारी जयराम शेंडे व इतर एकूण १२ रोजंदारी कर्मचाऱ्यास रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील एकूण १२ रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून पुढील अटी विचारात घेऊन रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे:-

(१) रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून शासन सेवेत कार्यरत आहेत आणि ज्यांच्या सलग सेवेस उशीरात उशीरा दिनांक-३१-१२-१९९८ रोजी ५ वर्ष पूर्ण झाली आहेत असे करारातील अटींची पूर्तता करणारे पात्र कर्मचारी,

(२) सन १९८६ पूर्वी व नंतर सेवेत लागलेल्या ज्या रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यामुळे जिल्हा परिषदेच्या सेवेतून कमी करण्यात आले होते. तथापि, ज्या कर्मचाऱ्यांनी अशा कपातीविरुध्द न्यायालयात दावे दाखल केले आहेत अशा कर्मचाऱ्यांपैकी,

(३) (अ) ज्यांना न्यायालयाच्या निर्णयानुसार पुन:स्थापित करण्यात आलेले आहे.

(ब) कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाप्रमाणे ज्या कर्मचाऱ्यांना जिल्हा परिषदेच्या सेवेत पुन:स्थापित न करता जिल्हा परिषदेच्या वतीने वरिष्ठ न्यायालयात रिव्हीजन/ अपील दाखल केले आहे परंतु त्यावर अजूनही निर्णय प्रलंबित आहे.

(क) कनिष्ठ न्यायालयाचा अवमान होऊ नये म्हणून अशा निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या इराद्याने ज्यांना सेवेत पुन:स्थापित करुन संबंधित कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द जिल्हा परिषदेच्या वतीने वरिष्ठ न्यायालयात रिव्हीजन/अपील दाखल केले आहे व सदर रिव्हीजन /अपील न्यायालयाने अजूनही अंतिमत: निकाली काढलेले नाही.

२. वरील (ii) मध्ये नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांबाबत मात्र संबंधित कर्मचाऱ्यांने रोजंदारी आणि किंवा कार्यव्ययी आस्थापनेवर न्यायमूर्ती कालेलकर करारातील तडजोडीनुसार सलग सेवेची केलेली व्याख्या लक्षात घेऊन पाच वर्षे सलग सेवा पूर्ण झाल्याच्या (यात उच्च पदावर रोजंदारी अथवा कार्यव्ययी आस्थापनेवरील सेवेचा समावेश असेल.) दिनांकास त्यांनी धारण केलेले त्या आस्थापनेवरील उच्चतम अथवा तत्सम पद रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर पुढील अटींच्या अधीन राहून रुपांतरित करता येईल:-

अ) त्याने संबंधित उच्च पदाकरिता आवश्यक असलेली तांत्रिक अर्हता प्राप्त केलेली असेल.

ब) संबंधित कर्मचाऱ्याची रोजंदारी/कार्यव्ययी आस्थापनेवरील इतर पात्र कर्मचाऱ्यामध्ये ज्येष्ठतम सेवा असेल.

क) त्याने सेवेची ५ वर्षे पूर्ण होण्याच्या दिवशी उच्च पदावर कमीत कमी २४० दिवस सलग सेवा केलेली असेल.

ड) ज्या कर्मचाऱ्यांनी अशी उपरोक्त (क) नुसार वरिष्ठ पदावर सेवा पूर्ण केली नसेल त्यांची त्या वरिष्ठ पदावर २४० दिवस सेवा पूर्ण होईपर्यंत त्यांचे मूळ पद रुपांतरित करता येईल.

३. ज्या कर्मचाऱ्यांनी न्यायालयात दावे /रिव्हीजन/अपील/अवमान याचिका दाखल केलेली आहे अशा कर्मचाऱ्यांनी वर नमूद केलेल्या सर्व प्रकारचे दावे विनाअट मागे घेतल्यानंतर त्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतची कार्यवाही जिल्हा परिषदेने करावी.

४. जर जिल्हा परिषदेने काही प्रकरणी कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द रिव्हीजन/अपील दाखल केलेले असेल तर असे अपील मागे घेऊन अशा प्रकरणामध्ये समाविष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणण्यात यावे.

५. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढीलप्रमाणे करण्यात येईल:-

१) जिल्हा परिषद, चंद्रपूर मधील एकूण १२ कर्मचाऱ्यांना दि.१ सप्टेंबर, २००० पासून त्यांचे रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यंतच्या वेतनवाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) ही प्रत्येक कर्मचाऱ्यांस त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

२) कर्मचाऱ्यांची रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून दि.३१/८/,२००० पर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकरच्या भत्त्यासहित) सन-२०१३-२०१४ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यांत संबंधित कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीत दहा (१०) समान हप्त्यात जमा करण्यात यावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्या कर्मचाऱ्यास खात्यातून काढता येणार नाही.

३) दि.१ सप्टेंबर, २००० पूर्वी वा नंतर जिल्हा परिषद सेवेतून सेवानिवृत्त झालेले असतील अशा कर्मचा-यांना त्याचप्रमाणे आता निधन पावले असतील अशा कर्मचाऱ्यांच्या वारसांना, मात्र त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपूर्ण रक्कम सन-२०१४-१५ या आर्थिक वर्षापासून पुढील ३ वर्षात समान वार्षिक हप्त्याने रोखीत देण्यात यावी.

६. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही अशाप्रकराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील

७. संबंधित जिल्हा परिषदांनी या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्यांना चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

८. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश कर्मचाऱ्यांस मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्तीनिहाय आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्याचे काढलेले व्यक्तीनिहाय आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्याची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

९. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेली पदे प्रथमत: दि.३१/३/२०१४ पर्यंत किंवा संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील यापैकी जो प्रथम दिनांक असेल त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

१०. सोबतच्या परिशिष्ट-अ मधील कर्मचाऱ्यांच्या यादीमध्ये रोजगार हमी योजनेतील व जिल्हा परिषदेच्या पाणीपुरवठा विभागातील तसेच जिल्हा परिषद निधीतून ज्यांचे वेतन व भत्ते दिली जातात अशा कर्मचाऱ्यांचा समावेश नाही याची खात्री जिल्हा परिषदेने करावी.

११. संबंधित रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणलेल्या प्रत्येक पदाकरिता विहित असलेली वयोमर्यादेची अट व सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

१२. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०२१४०१५९२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Anil Eknath Kulkarni
Date: 2015.03.17 12:23:10 +05'30'

अ.ए.कुलकर्णी
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
४. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
५. विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय,नागपूर विभाग,
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,चंद्रपूर,
७. महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद चंद्रपूर,
९. वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१०.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव,
११.कक्षअधिकारी,आस्था.७,८,९,११ व १२ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई४०० ०३२,
१२.निवड नस्ती, कार्यासन आस्था.१०,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

## परिशिष्ट-अ

## शासन निर्णय ग्राम विकास व जल संधारण विभाग क्र.काव्यआ-२०१४/प्रक्र-७७/आस्था-१०

## दिनांक, २ मार्च २०१५

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | आस्थापनेचा प्रकार रोजंदारी/ कार्यव्ययी | नेमणूकीचे पद | विभागाचे नाव | रुपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेव रघ्यावयाच्या पदाचे नाव | ज्या दिनांका पासून रुपांतरीत नियमितअस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचा आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री मुऱ्हारी जयराम शेंडे | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | १७.४.१९९७ |
| २ | श्री मनोहर ऋषी पाकमोडे | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | १.८.१९९५ |
| ३ | श्री विनय धर्माजी गेडाम | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | १६.१०.१९९४ |
| ४ | श्री प्रल्हाद पुंडलिक मोराडे | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | १४.४.१९९२ |
| ५ | श्री पांडुरंग सयाजी मेश्राम | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | ४.८.१९९४ |
| ६ | श्री आनंदराव मुकुंदा राऊत | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | ३०.११.१९९७ |
| ७ | श्री सुर्यभान रघू खडसंग | रोजंदारी | वरोरा | रोड मजूर | रोड मजूर | १०.९.१९९७ |
| ८ | श्री एकनाथ गणपती दहागांवकर | रोजंदारी | हजेरी सहाय्यक | जि.प.(सिंचाई)उप विभाग गोंडपिंपरी | हजेरी सहाय्यक | ३.६.१९९२ |
| ९ | श्री बापूराव नथ्थुजी बरडे | रोजंदारी | रोड मजूर | जि.प.(सा.बां.)उप विभाग वरोरा | रोड मजूर | ९.१०.१९९७ |
| १० | श्री मनोहर रामराव तेलंग | रोजंदारी | मजूर | जि.प.बांधकाम मजूर उप विभाग मुल | मजूर | १.४.१९९३ |
| ११ | श्री लिलाधर निलकंठ शेंडे | रोजंदारी | मजूर | जि.प.बांधकाम मजूर उप विभाग मुल | मजूर | १.१२.१९९३ |
| १२ | श्री विठठल नथ्थुजी गुरुपूडे | रोजंदारी | मजूर | ल.सिं.(जि.प.)उप विभाग नागभिड | मजूर | १७.४.१९९७ |